महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत अतिवृष्टीमुळे खचलेल्या व बुजलेल्या विहिरींच्या दुरुस्तीची कामे घेण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
### शासन निर्णय क्रमांक मग्रारो-२०१४/प्र.क्र.२५/मग्रारो-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २० जुलै, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्र. रोहयो-२००८/प्र.क्र.६५/रोहयो-१, दि. २४ सप्टेंबर,२००८
२) शासन निर्णय क्र. मग्रारो-२०१२/प्र.क्र.३०/रोहयो-१, दिनांक १७ डिसेंबर, २०१२
३) शासन निर्णय क्र.मग्रारो-२०१४/प्र.क्र.२५/मग्रारो-१, दिनांक २३ मे, २०१४
४) शासन परिपत्रक क्र. मग्रारो-२०१४/प्र.क्र.२५/मग्रारो-१, दिनांक ०५ जानेवारी, २०१५
५) शासन परिपत्रक क्र. मग्रारोहयो-२०१४/प्र.क्र.४५/रोहयो-७, दिनांक २० मे, २०१५
६) आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना आयुक्तालय, नागपूर यांचे पत्र क्र.आयुक्तालय/पंचायत/९५५/२०१५, दिनांक २६ मे, २०१५.

प्रस्तावना -

उपरोक्त संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक २३ मे, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत अतिवृष्टीमुळे खचलेल्या व बुजलेल्या विहिरींच्या दुरूस्तीची कामे करण्यात येत आहेत. तथापि, तांत्रिक मनुष्यबळाची कमतरता, अत्यल्प कामे सुरू होणे, तांत्रिक अडचणी, मुदतवाढ देण्याची मागणी या बाबी विचारात घेऊन आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना आयुक्तालय, नागपूर यांनी त्यांच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक ५ येथील २६ मे, २०१५ च्या पत्रान्वये शासन निर्णय दिनांक २३ मे, २०१४ मध्ये काही सुधारणा शासनास सादर केल्या आहेत. सदर सुधारणा लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तेव्हा संदर्भाधीन दिनांक २३ मे, २०१४ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

## शासन निर्णय-

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत अतिवृष्टीमुळे खचलेल्या व बुजलेल्या सिंचन विहिरींची दुरूस्तीची कामे करण्याचे या निर्णयान्वये अनुज्ञेय करण्यात येत आहे. दुरुस्तीच्या कामांबाबतची कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील :-

१) जिल्ह्यामध्ये अतिवृष्टी झाल्याचे किंवा पूर परिस्थिती निर्माण झाल्याचे जिल्हाधिकारी यांनी घोषित केलेले असावे. जिल्ह्यातील ज्या क्षेत्रामध्ये अतिवृष्टी अथवा पूर परिस्थिती निर्माण झालेली आहे त्या क्षेत्रातील संबंधित तलाठी, कृषि सहायक व तांत्रिक अधिकारी यांना खचलेल्या व बुजलेल्या विहिरींचे संयुक्तपणे पंचनामे करण्याबाबत जिल्हाधिकारी यांनी आदेश द्यावेत. संबंधितांनी, आदेशाच्या दिनांकापासून पंधरा दिवसांच्या आत, त्या क्षेत्रातील खचलेल्या व बुजलेल्या विहिरींची संयुक्तपणे स्थळ

पाहणी करून आपला अहवाल जिल्हाधिकाऱ्यांकडे सादर करावा. जिल्हाधिकाऱ्यांनी प्राप्त अहवालाच्या आधारे अतिवृष्टीमुळे खचलेल्या व बुजलेल्या विहिरींच्या दुरुस्तीचे काम अनुज्ञेय असलेल्या लाभधारकांची यादी प्रसिध्द करावी. सदर कामे महात्मा गांधी नरेगा अंतर्गत वैयक्तिक लाभाच्या योजनेसाठी पात्र असणाऱ्या खालील लाभार्थ्यांसाठीच आहेत. खचलेल्या व बुजलेल्या विहिरींची कामे घेताना खाली दर्शविलेल्या क्रमाप्रमाणे प्रवर्गातील कुटूंबांना प्राधान्य देण्यात यावे :-

अ) अनुसूचित जाती :

ब) अनुसूचित जमाती :

क) भटक्या जमाती :

ड) निरधिसूचित जमाती (विमुक्त जाती) :

इ) दारिद्र्यरेषेखालील इतर कुटूंबे :

फ) स्त्री - कर्ता असलेली कुटूंबे :

ग) शारीरिकदृष्ट्या अपंग व्यक्ती कर्ता असलेली कुटूंबे :

ह) जमीन सुधारणांचे लाभार्थी :

त) इंदिरा आवास योजनेखालील लाभार्थी :

थ) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वनवासी (वन हक्क मान्य करणे) अधिनियम, २००६ (२००७ चा २) खालील लाभार्थी आणि -

उपरोक्त प्रवर्गामधील पात्र लाभार्थींना प्राधान्य देण्यात आल्यानंतर, कृषि कर्जमाफी व कर्ज सहाय्य योजना, २००८ यामध्ये व्याख्या केलेल्या लहान व अल्पभूधारक शेतकऱ्यांना प्राधान्य देण्यात यावे.

२) खचलेल्या विहिरींच्या दुरुस्तीचे अंदाजपत्रक तयार करावे. मात्र, अंदाजपत्रकाची कमाल मर्यादा रुपये १,५०,०००/- इतकी असावी. सदरहू अंदाजपत्रकास महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तांत्रिक व प्रशासकीय मान्यता घ्यावी. अशा कामांचा शासन निर्णय क्र. मग्रारो-२०१२ / प्र. क्र. ३०/ रोहयो-१, दिनांक १७ डिसेंबर, २०१२ अन्वये स्थापन केलेल्या विभागीय स्तरावरील तांत्रिक समितीने प्रत्येक महिन्याला आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास पाठविणे अनिवार्य राहील.

३) अर्जदाराने सिंचन विहीर दुरुस्तीच्या प्रस्तावासोबत सातबारा जोडणे आवश्यक आहे. सातबारावर सिंचन विहिरीची नोंद असणे अनिवार्य आहे. अन्यथा सदर अर्ज रद्द करण्यात यावा.

४) शासन परिपत्रक दिनांक ०७ मार्च, २०१५ नुसार सिंचन विहिरींच्या दुरूस्तीसाठी अतिरिक्त तांत्रिक मनुष्यबळाची नियुक्ती करण्याचा निर्णय जिल्हाधिकारी यांनी त्यांचे स्तरावर घ्यावा.

५) विहिरी दुरूस्तीच्या कामांना प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर ०६ महिन्याच्या कालावधीत कामे पूर्ण करण्याचे अनिवार्य करण्यात येत आहे. जिल्हयातील

ग्रामपंचायत स्तरावरील मजुरी साहित्याचे ६० : ४० प्रमाण विचारात घेऊन विहीर दुरूस्तीचे काम शक्य असल्यास ग्रामपंचायतीकडे सोपविण्यात यावे. अन्यथा सदर कामे इतर यंत्रणेकडून करवून घ्यावीत. तसेच विहित स्तरावर ६० : ४० प्रमाण पाळावे.

६) शासन परिपत्रक, दिनांक २० मे, २०१५ नुसार मंजुर लेबर बजेटच्या २० टक्के खर्च सिंचन विहिरींवर करावयाचा आहे. या मर्यादेमध्येच सिंचन विहिरींची नवीन कामे व दुरूस्तीची कामे घेण्यात यावीत.तसेच शासनाने वेळोवेळी ठरवून दिलेल्या मर्यादेमध्येच कामे घेण्यात यावीत.

७) जिल्ह्यामध्ये अतिवृष्टी झाल्याचे किंवा पूर परिस्थिती निर्माण झाल्याचे जिल्हाधिकारी यांनी घोषित केलेल्या क्षेत्रासाठीच खचलेल्या व बुजलेल्या विहिरींच्या दुरुस्तीची कामे अनुज्ञेय राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२०१२२५५१२४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vimala R

Digitally signed by Vimala R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vimala R
Date: 2015.08.31 16:45:18 +05'30'

**आर. विमला**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव
४) मुख्य सचिवांचे स्वीय सहायक
५) अतिरिक्त मुख्य सचिव
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई - ४००० ३२
७) आयुक्त, आयुक्तालय, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर
८) सर्व विभागीय आयुक्त
९) सर्व जिल्हाधिकारी
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य , पुणे
१२) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
१३) कक्ष अधिकारी, संग्राम कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४००० ३२ (महाऑनलाईनवर प्रसिध्दीसाठी)
१४) सर्व उपसचिव / अवर सचिव / का.अ. (रोहयो)/ निवडनस्ती (रोहयो.१)